जिल्हा परिषदेतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या अखत्यारीतील यांत्रिकी उपविभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषद स्तरावर निर्मित पदावर हातपंप/ विजपंप देखभाल दुरूस्ती करिता कार्यरत नियमित कर्मचारी व नियमित पदावरून सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतन, सेवानिवृत्ती वेतन व भत्त्यांकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता संबंधित जिल्हा परिषदांना निधी वितरीत करण्याबाबत... लेखाशिर्ष २२१५ ए२९३

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः भूजल-१८२४/प्र.क्र.१६०/पापु-१९**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१

**दिनांक ०४ जून,२०२५**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांक जीडब्लयूओ-१४७७/५२२२/१६, दि.३१ मार्च,१९७८

२) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांक जीडब्लयू-१४८१/४५८४/१६, दि.११ सप्टेंबर,१९८१

३)शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: भुजल १८२३/प्र.क्र.८६/पापु१९, दि. ९ ऑगस्ट २०२५

४)शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.०७ एप्रिल,२०२५

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या अखत्यारीतील यांत्रिकी उपविभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषद स्तरावर निर्मित पदावर हातपंप/विजपंप देखभाल दुरूस्ती करिता कार्यरत नियमित कर्मचारी व नियमित पदावरून सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतन, सेवानिवृत्ती वेतन व भत्त्यांकरिता शासनाकडून जिल्हा परिषदेला अनुदान देण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक ०५ जुलै, २०२४ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने दिनांक ०९ ऑगस्ट,२०२४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सध्या जिल्हा परिषद अंतर्गत हातपंप/विजपंप देखभाल दुरूस्ती करिता कार्यरत नियमित कर्मचाऱ्यांच्या व नियमित पदावरून सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतन, सेवानिवृत्ती वेतन व भत्त्यांकरिता सेवानिवृत्ती वेतनासाठी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील तीन महिन्याकरिता संबंधित जिल्हा परिषदांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

जिल्हा परिषदेतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या अखत्यारीतील यांत्रिकी उपविभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषद स्तरावर निर्मित पदावर हातपंप/विजपंप देखभाल दुरूस्ती करिता कार्यरत नियमित कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्यांकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील नियमित मासिक वेतनासाठी वित्त विभागाने संदर्भाधीन (२) येथील परिपत्रकान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, संबंधित जिल्हा परिषदांना २२१५-एर९३ या लेखाशिर्षांतर्गत ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाखालील रुपये ४,०३,४०,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी तीन लक्ष चाळीस हजार फक्त) इतके अनुदान तसेच जिल्हा परिषदेतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या अखत्यारीतील यांत्रिकी उपविभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषद स्तरावर निर्मित पदावर हातपंप/विजपंप देखभाल दुरूस्ती करिता कार्यरत नियमित पदावरून सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्ती वेतनाकरिता संबंधित जिल्हा परिषदांना २२१५-एर९३ या लेखाशिर्षांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखालील रुपये ५,१६,९०,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी सोळा लक्ष नव्वद हजार फक्त ) असे एकूण रु. ९,२०,३०,०००/-(अक्षरी रुपये नऊ कोटी वीस लक्ष तीस हजार फक्त) निधी वितरीत करण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | जिल्हा परिषद | कर्मचारी संख्या | | या शासन निर्णयानुसार लेखाशिर्ष २२१५ एर९३ खाली माहे मार्च ते माहे मे -२०२५ या तीन महिन्याकरिता वितरीत करण्यात येत असलेले अनुदान (रु. लाखात) | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | नियमीत | सेवानिवृत्त | ३६, सहायक अनुदाने (वेतन) (रु. लाखात) | ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (रु. लाखात) | एकूण रकाना क्रमांक ५+६ (रुपय लाखात ) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | पालघर | ०५ | ०५ | ६.०० | ३.०० | ९.०० |
| २ | ठाणे | ०७ | १३ | ९.७० | ५.०० | १४.७० |
| ३ | रायगड | ०५ | २२ | ७.३० | १४.३० | २१.६० |
| ४ | रत्नागिरी | ०२ | ०९ | ३.४० | ९.०० | १२.४० |
| ५ | सिंधुदूर्ग | ०२ | ११ | २.२० | ०.२० | २.४० |
| ६ | नाशिक | २० | ३९ | ३३.४० | २०.९० | ५४.३० |
| ७ | धुळे | ०२ | १६ | ४.९० | १३.२० | १८.१० |
| ८ | नंदुरबार | ०७ | १६ | १९.०० | १५.६० | ३४.६० |
| ९ | जळगाव | १८ | ४३ | ३२.३० | २३.३० | ५५.६० |
| १० | अहिल्यानगर | ०० | ३२ | ०.०० | ६.६० | ६.६० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ११ | पुणे | १७ | ३९ | ३६.६० | ३३.४० | ७०.०० |
| १२ | सातारा | ०४ | ०८ | ५.३० | ६.९० | १२.२० |
| १३ | सांगली | ०५ | १६ | ६.३० | ९.८० | १६.१० |
| १४ | सोलापूर | १७ | ६६ | २०.२० | २५.५० | ४५.७० |
| १५ | कोल्हापूर | ०० | १५ | ०.०० | १३.०० | १३.०० |
| १६ | छ.सं.नगर | ०३ | ३५ | ६.९० | २६.६० | ३३.५० |
| १७ | बीड | ०२ | ५० | ४.२० | ४१.२० | ४५.४० |
| १८ | जालना | १४ | ४९ | ३२.८० | ३५.२० | ६८.०० |
| १९ | परभणी | ०७ | १५ | १६.९० | १२.२० | २९.१० |
| २० | नांदेड | १४ | ४३ | १९.१० | ०.०० | १९.१० |
| २१ | धाराशीव | ०७ | ३२ | ६.८० | २८.१० | ३४.९० |
| २२ | लातूर | १० | ४४ | १९.२० | ३३.४० | ५२.६० |
| २३ | हिंगोली | ०४ | ११ | ११.२० | १३.७० | २४.९० |
| २४ | अमरावती | १३ | ५७ | १६.०० | २४.०० | ४०.०० |
| २५ | यवतमाळ | ०१ | १७ | १.४० | ९.४० | १०.८० |
| २६ | बुलढाणा | १२ | ४५ | २०.३० | ३८.३० | ५८.६० |
| २७ | अकोला | ०२ | १५ | ४.२० | ६.०० | १०.२० |
| २८ | नागपूर | ०९ | २१ | १५.०० | १४.३० | २९.३० |
| २९ | भंडारा | ०१ | ०१ | ०.८० | ०.५० | १.३० |
| ३० | वर्धा | १८ | २२ | २४.०० | १२.०० | ३६.०० |
| ३१ | चंद्रपूर | ०० | १० | ०.०० | ८.४० | ८.४० |
| ३२ | गडचिरोली | ०९ | २० | १८.०० | १३.९० | ३१.९० |
| | **एकूण** | **२३७** | **८३७** | **४०३.४०** | **५१६.९०** | **९२०.३०** |

०२. शासन निर्णय दि.०९.०८.२०२४ मध्ये नमूद सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

०३. दि.०९.०८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरण पत्र २ व ३ मध्ये नमूद नियमित व सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या यादीमध्ये संबंधित कर्मचाऱ्याचे नाव नमूद आहे म्हणून संबंधित कर्मचाऱ्यांना शासनाच्या वतीने वेतन/ सेवानिवृत्ती वेतन देय आहे असे नाही.शासन निर्णय, दि.३१.०३.१९७८ व दि.११.०९.१९८१ नुसार ज्या कर्मचाऱ्यांची नियमित नियुक्ती ही जिल्हा परिषद आस्थापनेवर निर्मित नियमित पदावर हातपंप /विजपंप देखभाल दुरूस्ती योजनेतंर्गत त्रिस्तरीय योजनेवरील झाली आहे अशा कर्मचाऱ्यांचे वेतन व नियमित पदावरून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतन व सेवानिवृत्तीचे दायित्व शासनाने दि.०९.०८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये

स्वीकारले आहे. सबब, दि.०९.०८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरण पत्र २ व ३  मध्ये नमूद नियमित व सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांची सदर पदावर नियुक्ती व सदर नियमित पदावरती वेतन निश्चिती झाल्याची खातरजमा जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी करावी.

**०४.  जरी जिल्हा परिषद आस्थापनेवर निर्मित नियमित पदावर कार्यरत हातपंप /विजपंप देखभाल दुरूस्ती योजनेतंर्गत त्रिस्तरीय योजनेवरील कर्मचारी व नियमित पदावरुन सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या वेतनाचे दायित्व शासनाने घेतली असली तरी सदरील कर्मचाऱ्यांची नियुक्ती  ही नियमित पदावरील नसल्यास त्यांच्या वेतन व भत्यांचे दायित्व प्रचलित पदध्तीनुसार  जिल्हा परिषदेचे राहील.**

०५.  दिनांक ०९.०८.२०२४ च्या शासन निर्णयापूर्वीची थकबाकी या निधीतून अदा करु नये. तसेच संदर्भाधीन दिनांक ०९.०८.२०२४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या पदनामानुसार संबंधित कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय होणाऱ्या वेतन श्रेणीप्रमाणे वेतन /सेवानिवृत्ती वेतन अदा करण्याची दक्षता घ्यावी. दि.०९.०८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयात नाव नमूद नसणाऱ्या कर्मचाऱ्यांना सदरील अनुदानातून वेतन/सेवानिवृत्तीवेतन व भत्यांची अदायगी करू नये.

०६.  या निधीचा अन्य कारणांसाठी किंवा अन्य कर्मचाऱ्यांना वेतनासाठी उपयोग करणे,ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व त्याकरिता संबंधित जबाबदार अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र असतील

०७.  सदर सहायक अनुदान वेतनासाठी असल्याने वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार ते “बिनशर्त” स्वरुपाचे आहे.

०८.  खर्चासाठी जेवढ्या निधीची आवश्यकता आहे, तेवढाच निधी कोषागारातून आहरित करण्याची दक्षता जिल्हा परिषेदेने घ्यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केली जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. तसेच झालेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाची वेळोवेळी ताळमेळ घ्यावा. ताळमेळाचा काम प्रलंबित असल्यास पुढील निधी वितरीत करण्यात येणार अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाउंटमध्ये ECS व्दारे.प्रदान करणे बंधनकारक राहील कोणत्याही परिस्थित अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व offline पध्दताने  वितरीत करण्यात येऊ नये.

०८.  वितरीत केलेला निधी कोषागारातून  आहरित करण्यापूर्वी  तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तीकेतील तरतूदी व सर्व अटी/ शर्ती  पालन करावे.

०९. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या **वेतनावरील खर्च** "मागणी क्रमांक वाय-२ २२१५- पाणीपुरवठा व स्वच्छता,१९६- जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (०१)- ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजना, (०१) (०८) जिल्हा परिषद अंतर्गत हातपंप/विजपंप देखभाल दुरुस्तीकरीता कार्यरत नियमित कर्मचाऱ्यांचे वेतन, भत्ते व सेवानिवृत्ती लाभ, **३६ सहायक अनुदाने (वेतन)**" (२२१५-ए२९३) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. हातपंप वीजपंप देखभाल दुरुस्तीकरिता कार्यरत नियमित पदवरून सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या **सेवानिवृत्तीवेतनावरील खर्च** "मागणी क्रमांक वाय-२ २२१५- पाणीपुरवठा व स्वच्छता,१९६- जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (०१)- ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजना, (०१) (०८) जिल्हा परिषद अंतर्गत हातपंप/विजपंप देखभाल दुरुस्तीकरीता कार्यरत नियमित कर्मचाऱ्यांचे वेतन, भत्ते व सेवानिवृत्ती लाभ, ,**३१-सहायक अनुदान (वेतनेत्तर)** या (२२१५-ए२९३ ) लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

११. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थस २०२५/प्र.क्र ४४/अर्थ-३ दिनांक ७ एप्रिल, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०४१५२४५५९८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=0fea5cae29d80a4f500842e3ec1a32608f603b343a904f1f366c9491356ac06d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2025.06.04 15:25:36 +05'30'

**( राणी देवकत्ते )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, (सर्व)
२. जिल्हाधिकारी, ( सर्व)
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
४. संचालक/उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, (सर्व)
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, (सर्व)

६. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, (सर्व)
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. आपुक कक्ष, व्यय-३, अर्थ-१८, सेवा-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (कार्यासन-पापु-१९), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.